**मौजे गारखेडा क्र. १ ता.जि. औरंगाबाद या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१६/प्र.क्र. १०८ /पापु १८**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ जुलै, २०१७

**वाचा -**

१) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे मुळ तांत्रिक मान्यता आदेश क्र.६४७, दिनांक ०२/०९/२०१४.
२) शासन निर्णय क्रमांक पापुयो-२०१४/प्र.क्र.१६०/पापु-१८, दिनांक ०१/०९/२०१४.
३) ग्रामपंचायत गारखेडा क्र.१, ता.जि.औरंगाबाद यांचा ग्रामसभा ठराव क्र.६, दि.२६/०२/२०१६.
४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश क्र.६९८ दि. ०३/०६/२०१७.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे पत्र क्र.जिपऔ/पापु/तांशा/२०१६/६४२, दिनांक १९/०३/२०१६.

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे गारखेडा क्र.१ (ता.जि.औरंगाबाद) नळ पाणी पुरवठा योजनेस कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.१ येथील आदेशान्वये रु. ९०,०२,९००/- (ढोबळ) किमतीच्या अंदाजपत्रकास मुळ तांत्रिक मान्यता देण्यात आली होती. संदर्भ क्र .२ येथील शासन आदेशान्वये सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी सदर योजनेतील पाझर तलावाच्या वेस्टवेअर वाढल्यामुळे विहिरीचे जमीनीपासून वरचे बांधकाम वाढल्याने, तसेच विहिरीची खोली १८ मीटर ऐवजी २५ मीटर करण्यात आली. विहिरीची जागा बदलल्यामुळे जोडबंधाऱ्यांची लांबी वाढली असल्याने संदर्भ क्र. ३ अन्वये ग्रामपंचायत गारखेडा क्र. १, ता. औरंगाबाद यांचेकडून सदर योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली. तसेच पंपाचे अश्वशक्तीमधील बदलांमुळे किमतीत वाढ झाली आहे. विहिरीचे काम पुर्ण झाल्यानंतर विद्युत जोडणीच्या किंमतीत वाढ झाली असल्याने कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.४ अन्वये प्रस्तुत योजनेच्या **रु.१,४४,५१,२२७/-(ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. परिणामी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा

परिषद, औरंगाबाद यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.५ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

मौजे **गारखेडा क्र. १** (ता.जि. औरंगाबाद ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१,३७,२२,११७/-(ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी सदोतीस लक्ष बावीस हजार फक्त) (वाढीव रकमेवरील ETP कमी करुन)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

### अटी

१. योजनेतील सर्व कामे सुधारीत अंदाजपत्रकातील किंमतीच्या मर्यादेत ४ महिन्यात पूर्ण करावीत
२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. या योजनेची कामे पूर्ण झाल्यावर योजनेचे लेखे पूर्णपणे बंद करून योजना संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, औरंगाबाद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी व कंत्राटदार यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.
४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/ nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. ४७,१९,२१७/- (अक्षरी रुपये सत्तेचाळीस लक्ष एकोणीस हजार दोनशे सतरा फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३१/१४४३, दिनांक ०३/०४/२०१७ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १६४/व्यय-३, दिनांक २३/०६/२०१७ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०६१८०८५९२४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh D. Ambekar

Digitally signed by Suresh D. Ambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=296e3c880fd1b089cf7bc9aed875e1bd95a2e8ed913596c74f7aa9e24917bc3c, cn=Suresh D. Ambekar
Date: 2017.07.12 16:09:01 +05'30'

**( सु.दे.आंबेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, औरंगाबाद.

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद.
११) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१२) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद.
१३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१६) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) मु.अ.तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१८) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४४३)/वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
१९) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.